**प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत भागीदारी तत्वावरील परवडणाऱ्या घरांची निर्मिती (AHP) या घटकाच्या माध्यमातून रे नगर सोलापूर येथील गृहप्रकल्पास राज्य हिश्याचा रु.१२० कोटी इतका निधी विशेष बाब म्हणून मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रआयो/२०१८/प्र.क्र.७४/गृनिधो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: १६ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा -**

१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो-२०१५/प्र.क्र.११०/गृनिधो-२, दि.९/१२/२०१५
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो-२०१७/प्र.क्र.५२/गृनिधो-२, दि.२१/२/२०१८
३) शासन आदेश, समक्रमांक दि.२७/८/२०१८

**प्रस्तावना-**

देशातील प्रत्येकाला हक्काचे घर उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र सरकारने जून, २०१५ मध्ये 'प्रधानमंत्री आवास योजना-सर्वांसाठी घरे' सुरु केलेली आहे. सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने राज्य मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भ क्र.१ अन्वये शासन निर्णय निर्गमित केला आहे. प्रधानमंत्री आवास योजना राज्यातील ३८२ शहरांमध्ये राबविण्यास केंद्र सरकारने मान्यता दिलेली आहे. तसेच राज्याने सन २०२२ पर्यंत १९.४० लक्ष घरकुलांच्या बांधणीचे उद्दिष्ट निश्चित केलेले आहे.

सदर योजनेंतर्गत गृहप्रकल्पांना राज्य हिश्याचा निधी सहजपणे उपलब्ध व्हावा या हेतूने आवश्यक असलेल्या निधीची पूर्तता महाराष्ट्र निवारा निधीतून वितरीत करण्यास शासनाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेली आहे. तर सहकारी तत्वावर प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत खाजगी भागीदारीव्दारे परवडणाऱ्या घरांची निर्मिती (AHP) या घटकातील प्रकल्पांना जोत्यापर्यंतच्या बांधकामाची अट शिथील करुन राज्य शासनाच्या हिश्याचा पहिल्या टप्याचा प्रतिलाभार्थी रु.४० हजार (४०%) इतका निधी महाराष्ट्र निवारा निधीतून सरसकट वितरीत करण्यास एक विशेष बाब म्हणून वितरीत करण्याबाबत संदर्भ क्र.३ येथील शासन आदेश पारीत केलेला आहे. त्यानुषंगाने प्रधानमंत्री आवास योजनेच्या घटक क्र.३- खाजगी भागीदारीव्दारे परवडणाऱ्या घरांची निर्मिती(AHP) अंतर्गत रे नगर सोलापूर येथील ३० हजार घरकुलांच्या प्रकल्पाला राज्य शासनाच्या हिश्याचा प्रतिलाभार्थी रु.४० हजार (४०%) इतका निधी महाराष्ट्र निवारा निधीतून सरसकट वितरीत करण्यास एक विशेष बाब म्हणून मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत घरकुलांच्या बांधकामास गती देण्यासाठी तसेच राज्याने निश्चित केलेले घरकुलांचे उद्दिष्ट विहित कालावधीत पूर्ण करण्याच्या अनुषंगाने योजनेच्या घटक क्र.३- खाजगी भागीदारीव्दारे परवडणाऱ्या घरांची निर्मिती (AHP) अंतर्गत रे नगर सोलापूर

येथील ३० हजार घरकुलांच्या प्रकल्पालाजोत्यापर्यंतच्या बांधकामाची अट तसेच बँक गॅरंटी देण्याची अट एक विशेष बाब म्हणून शिथील करण्यात येत आहे. त्यानुषंगाने सदर प्रकल्पाला राज्य शासनाच्या हिश्याचा प्रतिलाभार्थी रु.४० हजार (४०%) याप्रमाणे एकुण रु.१२० कोटी इतका निधी महाराष्ट्र निवारा निधीतून सरसकट वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर निधी वितरीत करताना रे नगर सोलापूर येथील प्रकल्पाने बांधकाम परवानगी घेणे, रेरा कार्यद्यांतर्गत नोंदणी करणे आणि पर्यावरण समितीची परवानगी घेणे इ.बाबींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

प्रकरणानुषंगाने वितरीत करण्यात येणाऱ्या राज्य हिश्याच्या निधीचा योग्य विनियोग तसेच प्रकल्पाची भौतिक प्रगती याबाबतच्या नियंत्रणाची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील. किंबहुना, यासंदर्भात भविष्यात काही अनियमितता झाल्यास तसेच महालेखापाल कार्यालयाकडून काही परिच्छेद उपस्थित करण्यात आल्यास त्याचेही उत्तरदायित्व संबंधित अंमलबजावणी यंत्रणेचे राहील.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. त्याचा संकेताक २०१८१०१६१७५६३०३२०९ असा आहे. तसेच सदरचा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ranjeet Annasaheb Patil

Digitally signed by Ranjeet Annasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bf330a8fd32cb0303cd333566a693f1c1b6e21697a18d4ebe592b7edd76c8c25, serialNumber=87806c71f378b24b758ee04ca6ca7e3902af4750ed37382a14676de160fa8bf5, cn=Ranjeet Annasaheb Patil
Date: 2018.10.16 17:59:39 +05'30'

**(रणजीत आ.पाटील)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, म. वि. स., विधानभवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, म. वि. स., मुंबई
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.
९) व्यवस्थापकीय संचालक,शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१.
११) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
१२) निवडनस्ती/गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.